प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतंर्गत येडगाव,
ता.जुन्नर येथील पर्यटन स्थळांचा विकास करणे
सल्लागार नियुक्तीकरिता सुकाणू समिती गठीत
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र.सिडीए-१०११/(३८५/११)/लाक्षेवि(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ ऑक्टोबर,२०११

पहा :- १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस-२०१०/प्र.क्र.२७१/पर्यटन, दि.५ मार्च २०११
२) सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. खाक्षेस-१०९५/प्र.२१६/रस्ते-८, दि.११ डिसेंबर १९९७

**प्रस्तावना :-**

मा.मंत्री, वित्त व नियोजन यांच्या अध्यक्षतेखाली व मा.मंत्री, उर्जा व जलसंपदा (मकृखोपाम वगळून) यांच्या उपस्थितीत दि. २२/०६/२०१० मध्ये झालेल्या बैठकीमध्ये दिलेल्या निर्देशानुसार येडगाव धरण परिसरात पर्यटन स्थळ व यशवंतराव चव्हाण स्मारक विकसीत करण्यासाठी रु.९६.९२ कोटीचा सविस्तर प्रस्ताव जिल्हाधिकारी, पुणे यांचेमार्फत प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावानुसार उपरोक्त संदर्भाधिन अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पर्यटन स्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्याकरिता प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत येडगाव, ता.जुन्नर येथील यशवंतराव चव्हाण स्मारक व परिसर सुशोभिकरण, येडगाव जलशयामध्ये बोटींग सुविधा आणि पर्यटकांसाठी निवास व्यवस्था करणे, या कामाकरिता सन २०१०-२०११ साठी रु.१.५० कोटीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देवून रु.५० लाख निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

उपरोक्त कामे करण्यासाठी सल्लागाराची नेमणूक करण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.११/१२/१९९७ च्या शासन निर्णयानुसार सुकाणू समिती (Steering Committee) गठीत करण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

येडगाव धरण स्थळी आदरणीय यशवंतराव चव्हाण यांचे स्मारक उभारणे व पर्यटन स्थळ विकसीत करणे या विकास कामातंर्गत एकूण प्रकल्पाची अंदाजपत्रकीय किमंत रु.९६.९२ कोटी इतकी आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.११/१२/१९९७ च्या शासन निर्णयामधील मुद्दा क्र.२.२(ब) नुसार जाहिर निविदेद्वारे सल्लागार नियुक्तीकरिता वर्तमानपत्रात मोठया

प्रमाणात प्रसिध्दी देणे आवश्यक आहे. इच्छूक सल्लागाराकडून खुले स्पर्धात्मक देकार काही अर्हता अटीसह (Qualification) बोलविण्यात यावे. मुख्य अभियंता यांनी कामाच्या प्रकारानुसार किमान अर्हता ठरवावी. सल्लागाराकडून प्राप्त झालेल्या देकारांचे मुल्यांकन करुन सल्लागाराची नेमणूक करावी. यामध्ये तांत्रिक गुणवत्तेस अधिक महत्व देण्यात यावे. तांत्रिक व आर्थिक मुल्यमापनाचे निकष ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे सुकाणू समिती (Steering Committee) गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे | - | अध्यक्ष |
| २) मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे-११ | - | सदस्य |
| ३) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे | - | सदस्य |
| ४) कार्यकारी अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, (तांत्रिक कक्ष) पुणे-११ | - | सदस्य |
| ५) कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्र.१, नारायणगांव. | - | सदस्य-सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०११११००४१२५६०९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज.मा.लिहीतकर )
शासनाचे उप सचिव

प्रत :-

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोपाम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोपाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव,जलसंपदा यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
सचिव, लाक्षेवि यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग,
महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता
मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे,
मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे-११
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, पुणे,
कार्यकारी अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण (तांत्रिक कक्ष) पुणे-११
कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्र.१, नारायणगांव,
नियोजन / वित्त / पर्यटन व सांस्कृतिक कार्य / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
लाक्षेवि (कामे), कार्यासन संग्रहार्थ.